केंद्रीय ११ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार तुरुंग प्रशासनाचा दर्जा सुधारण्यासाठी केंद्रशासनाकडून मिळालेल्या अर्थसहाय्यातून रु. २.६२ कोटीच्या कामांना प्रशासकीय मान्यता देणे व निधी उपलब्ध करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

शासन निर्णय क्र. एमआरएस २००३/प्र.क्र.१८०/पीआरएस-२

मंत्रालय, मुंबई-३२, दि. १७ फेब्रुवारी, २००४

पहा :- १) कारागृह उप महानिरिक्षक (मुख्यालय), कारागृह महानिरीक्षणालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. बीजीटी/११ वे वित्तआ/सुधारणा/अनुदान/७७७०/कक्ष-४, दि. १४.८.२००३

<u>शासन निर्णय</u> :- अकराव्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार तुरुंग प्रशासनाचा दर्जा सुधारण्याकरिता सन २०००-२००१ ते २००४-२००५ या कालावधीकरीता केंद्रीय गृहमंत्रालयाने रुपये आठ कोटी इतका निधी शिफारीत केलेला आहे. ही योजना १००% केंद्र पुरस्कृत आहे. उपरोक्त शिफारीत निधीपैकी रु. ३.२२ कोटी राज्यास प्राप्त झालेले आहे. प्राप्त अनुदानामधून राज्यातील मुंबई, ठाणे, नाशिक व अमरावती मध्यवर्ती कारागृहे तसेच कल्याण जिल्हा कारागृहातील स्वयंपाक गृहाच्या आधुनिकीकरणासाठी रु. ५४.३५ लक्ष खर्च सन २००२-०३ मध्ये झालेला असून उर्वरीत रकमेतून रु. २.६२ कोटी इतकी रक्कम कारागृहातील ११ व्या केंद्रिय वित्त आयोगाच्या शिफारशीत नमुद केलेल्या निरनिराळ्या बाबींवर खर्च करण्यासाठी कारागृह महानिरीक्षणालयाच्या दि. १४.८.२००३ च्या पत्रान्वये प्रस्ताव शासनास सादर केला होता. त्यानुषंगाने अकराव्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यशासनास तुरुंग प्रशासनाचा दर्जा सुधारण्यासाठी मिळणाऱ्या केंद्रिय निधीतून (१००% केंद्र पुरस्कृत) खालील नमुद बाबींवर रु. २.६२ कोटी खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता व निधी वितरणास मंजूरी या शासननिर्णयान्वये देण्यात येत आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र. | बाबींचे नाव | संबंधित कारागृहाचे नांव | रक्कम |
| --- | --- | --- | --- |
| १ | २ | ३ | ४ |
| अ) | कारागृहातील स्वयंपाकगृहाची अंतर्गत सुधारणा | | |
| | १) मध्यवर्ती कारागृहात एल.पी.जी.गॅस प्लॅन्ट बसवून व इतर दुरुस्ती करुन स्वयंपाकगृहाचे आधुनिकीकरण | कोल्हापूर व येरवडा (पुणे) मध्यवर्ती कारागृह. | २०.०० |
| | २) जिल्हा कारागृहास एलपीजी गॅस प्लॅन्ट बसवून व इतर दुरुस्ती करुन स्वयंपाकगृहाचे आधुनिकीकरण | वर्धा, अलिबाग, रत्नागिरी, सांगली, सातारा, अहमदनगर, कोल्हापूर (शहर), सोलापूर येथील जिल्हा कारागृहे तसेच येरवडा व पैठण खुले कारागृहे | २४.०० |
| ब) | कारागृहातील बंद्यांना वैद्यकीय सुविधा पुरविणे | | |
| | १) बंद्यांना दवाखान्यात ने-आणण्यासाठी रुग्णवाहिका खरेदी करणे | नागपूर, अमरावती, नासिक रोड, ठाणे, मुंबई व कोल्हापूर येथील मध्यवर्ती कारागृह तसेच अकोला, कल्याण, अलिबाग, रत्नागिरी, सांगली, विसापूर, उस्मानाबाद, बीड, पैठण, नासिक (बोस्टल स्कूल) व सोलापूर येथील जिल्हा कारागृहे. | ७२.०० |
| | २) इ.सी.जी. मशीन, ग्लुकोमीटर, वॉटर कुलर, रेफ्रीजरेटर खरेदी करणे | नागपूर, अमरावती, कोल्हापूर, नासिक रोड, व औरंगाबाद येथील मध्यवर्ती कारागृहे तसेच कल्याण, परभणी, पैठण, सोलापूर, सांगली व अलिबाग येथील जिल्हा कारागृहे. | ३.५० |
| | ३) लहान शस्त्रक्रीयागार (operation Theatre) दुरुस्ती/बांधकाम व इतर अत्यावश्यक उपकरणे | येरवडा मध्यवर्ती कारागृह | ५.०० |
| | ४) आंतर रुग्ण विभागाची (OPD ward) दुरुस्ती | अमरावती मध्यवर्ती कारागृह व अकोला जिल्हा कारागृह | २.०० |
| | ५) डेन्टल चेअर व इतर आवश्यक उपकरणे | ठाणे, कोल्हापूर, नासिक, नागपूर मध्यवर्ती कारागृह | ५.५० |
| क) | व्यावसायिक प्रशिक्षण | | |
| | १) संगणक खरेदी (इतर आवश्यक यंत्रसामुग्री सॉफ्टवेअर इत्यादीसह) व झेरॉक्स मशीन खरेदी | कोल्हापूर मुंबई व ठाणे मध्यवर्ती कारागृह तसेच कल्याण, वर्धा, अलिबाग, अहमदनगर व कोल्हापूर (शहर) जिल्हा कारागृहे | १०.०० |
| | २) डायरेक्ट मोल्डिंग मशीनची खरेदी (चर्मोद्योग) | येरवडा (पुणे) व नाशिक रोड मध्यवर्ती कारागृह | १२०.०० |
| | एकूण :- | | २६२.०० |

२. उपरोक्त रु. २.६२ कोटी खर्चाच्या बाबींचा समावेश केंद्र शासनाच्या पाठविण्यात आलेल्या आराखड्यामध्ये करण्यात आला आहे. या योजनेसाठी गृह विभाग शासन निर्णय क्र. बीजीटी-२००३/प्र.क्र.११२/पीआरएस-२, दि. ८ जुलै, २००३ च्या शासन निर्णयान्वये "मागणी क्र. बी-५, २०५६-तुरुंग" (योजनेतर) या मुख्यलेखाशिर्षाखाली महालेखापालांच्या मान्यतेने नवीन उपशीर्ष उघडण्यात आले आहे. जुलै, २००३ च्या विधीमंडळ अधिवेशनात या उपशिर्षाखाली सन २००३-०४ च्या अर्थसंकल्पात रु. २.६२ कोटीची तरतूद पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आली असून सदरहू निधी वितरणासाठी उपलब्ध आहे. हे १००% केंद्रीय अर्थसहाय्य आहे.

३. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५,-२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००)(१०) अकराव्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार तुरुंग प्रशासनाचा दर्जा वाढ (२०५६-०१९-८) (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर/दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २००३-२००४ या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा तसेच या प्रस्तावातील खरेदी विहीत पध्दतीनेच करण्यात यावी.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे सहमतीने व त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्र.१/०४/व्यय-७, दि. ३१.१.२००४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत, विशेष
- अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय)/पुणे/मुंबई/औरंगाबाद/नागपूर.
- अधिक्षक, मध्यवर्ती कारागृह,येरवडा पुणे / मुंबई / औरंगाबाद /नाशिक रोड /कोल्हापूर / अमरावती /ठाणे/नागपूर
- अधिक्षक, जिल्हा कारागृह, कल्याण /वर्धा / अलिबाग / रत्नागिरी/सातारा/अहमदनगर/ परभणी / सोलापूर /कोल्हापूर (शहर) / बीड / सांगली / अकोला / उस्मानाबाद /पैठण खुले कारागृह /येरवडा खुले कारागृह/प्राचार्य बोस्टन स्कूल नाशिक/विसापूर खुली वसाहत, अहमदनगर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.

- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा) मुंबई / नागपूर.
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
- जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे/पुणे/औरंगाबाद /नागपूर/ नाशिक / कोल्हापूर / अमरावती/बीड/वर्धा/अलिबाग/रत्नागिरी/सांगली/सातारा/अहमदनगर/सोलापूर/परभणी / अकोला/ उस्मानाबाद.
- अवर सचिव (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- नियोजन विभाग (कार्यासन-१४५१), मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग (व्यय-८/वित्त आयोग शाखा), मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती - पीआरएस-२.